**राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात क्षेत्र विकास कार्यक्रम राबविण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजुरी बाबत सन २०१८-१९.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : क्षेविका-नाक्षेवि-२०१८/प्र.क्र.१३९/का९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादामा कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ नोव्हेंबर २०१८.

<u>संदर्भ</u> :- १) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.७६/का.९, दि. १८ जून, २०१५

२) शासन पूरकपत्र, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.५/का.९, दि. ९ मार्च, २०१६.

३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१८/प्र.क्र.५०/का.९, दि. १८ जून, २०१५

४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१८/प्र.क्र.२७/का.९, दि. ३१ मार्च, २०१८

५) शासन निर्णय,शासन निर्णय क्रमांक अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१८/ प्र.क्र.५१/का.९,दि. ८ मे ,२०१८.

६) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.क्षेविका-२०१८/प्र.क्र.८३/का-९, दि.३० ऑक्टोबर, २०१८

७) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.नाक्षेवि-२०१८/प्र.क्र.१४०/का-९, दि.१७ नाव्हेंबर, २०१८

८) जिल्हा नियोजन अधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, जिल्हाधिकारी कार्यालय यांचे पत्र क्र. जिनिस-१०३०/का-०३/अल्पनाक्षेविकास कार्य/१८-१९/१३२०, दि.०५ ऑक्टोबर, २०१८

९) शासन परिपत्रक, वित्त विभाग , क्र. अर्थसं - २०१८ / प्र.क्र. ६९/अर्थ-३, दि. ०२ एप्रिल, २०१८.

<u>प्रस्तावना :-</u>

अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला असून उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये ही योजना सन २०१५-१६ या वर्षात राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.२ येथील शासन पूरकपत्रान्वये, दिनांक १८ जून, २०१५ रोजीच्या शासन निर्णयातील योजनेची कार्यपध्दती या शीर्षाखाली परिच्छेद (ब) (iii) च्या पुढे परिच्छेद दाखल करण्याचा निर्णय शासन मान्यतेने घेतला आहे. त्यानुसार मा. खासदार व आमदार यांच्या प्रस्तावांना महानगरपालिका/नगरपालिका/ नगरपंचायत हद्दीमध्ये कामाच्या संख्येची मर्यादा एकापेक्षा जास्त परंतू प्रति काम प्रति काम प्रति वर्षी महानगरपालिकेस कमाल रु.४० लक्ष, "अ" वर्ग नगरपालिकेस कमाल रु.३० लक्ष, "ब" व "क" वर्ग नगर पंचायतींना असू शकेल, अशी तरतूद आहे. मा. खासदार व आमदार व जिल्हाधिकारी यांच्याकडून महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायत यांचे प्राप्त प्रस्तावांना निधीच्या उपलब्धतेनुसार मंजूरी देण्याची कार्यवाही करण्यात येते.

२. उपरोक्त संदर्भ क्र.४ च्या दिनांक ३१.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, सन २०१७-१८ करीता परिशिष्ट-अ मधील अनु.क्र.२ येथील मुंबई उपनगर जिल्ह्याकरीता विकास कामे मंजूर करण्यात आली होती. तथापि, सदर मंजूर निधी उपलब्ध न झाल्याने, सन २०१८-१९ या अर्थसंकल्पीय निधीमधून सदर निधी उपलब्ध करुन द्यावा अशी विनंती संदर्भ क्र.८, दिनांक ०५.१०.२०१८ च्या पत्रान्वये, करण्यात आलेली आहे. वस्तुत: संदर्भ क्र.४ च्या दि.३१.०३.२०१८ अन्वये, मंजूर करण्यात आलेल्या विकास कामांचा निधी त्याच दिवशी अर्थसंकल्प वितरण प्रणाली (बीडीएस) प्रणालीवर वितरीत करण्यात आला होता. मात्र, संबंधित कार्यालयाने तो निधी विहित मुदतीत आहरीत न केल्यामुळे व्यपगत झाला आहे. तथापि, सदर विकास कामे पूर्ण करण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील उपरोक्त योजनेसाठी उपलब्ध तरतूदीमधून मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २०१८-१९या आर्थिक वर्षात नागरी क्षेत्र विकास योजनेकरिता रु.२६,४०,००,०००/-(अक्षरी रूपये सव्वीस कोटी चाळीस लक्ष फक्त ) एवढी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक ०२ एप्रिल, २०१८ अन्वये प्रथम नऊ महिन्यांकरिता (डिसेंबर,२०१८ अखेर) अर्थसंकल्पित निधीच्या ७० टक्के निधी वितरणास मान्यता प्राप्त झाली आहे. त्यामुळे एकूण मूळ अर्थसंकल्पित रु.२६,४०,००,०००/-(अक्षरी रूपये सव्वीस कोटी चाळीस लक्ष फक्त) तरतूदीच्या ७० टक्के म्हणजे रू.१८,४८,००,०००/-(अक्षरी रूपये अठरा कोटी अठ्ठेचाळीस लक्ष फक्त) एवढा निधी डिसेंबर, २०१८ अखेर पर्यंत उपरोक्त बाबींकरिता वितरणास उपलब्ध आहे. त्यापैकी शासन निर्णय दिनांक ८ मे २०१८ अन्वये रु.३०,००,०००/- (अक्षरी रुपये तीस लक्ष फक्त), शासन निर्णय, दिनांक ३०.१०.२०१८ अन्वये रु.१०,३३,००,०००/-(अक्षरी रुपये दहा कोटी तेहत्तीस लक्ष फक्त) व शासन निर्णय, दिनांक १७.११.२०१८ अन्वये रु.१०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लक्ष फक्त) असे एकूण रु.१०,७३,००,०००/-(अक्षरी रुपये दहा कोटी त्र्याहत्तर लक्ष फक्त) अनुदान वितरीत करण्यात आले आहे. सबब, उर्वरित रु.७,७५,००,०००/-(अक्षरी रुपये सात कोटी पंच्याहत्तर लक्ष फक्त) मधून **परिशिष्ट-अ** मध्ये दर्शविल्याप्रमाणे क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत मुंबई उपनगर जिल्हयातील विकास कामांकरीता रु.५०,००,०००/-(अक्षरी रुपये पन्नास लक्ष फक्त) लक्ष निधी मंजूर करण्यात येत आहे.

२. संबंधित महानगरपालिका / नगरपालिका/ नगरपंचायतींना मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. **परिशिष्ट "अ"** मध्ये दर्शविलेली कामे इतर योजनेतून करण्यात आलेली नाहीत, याची शहानिशा व खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करावी व जर सदर काम इतर योजनेतून मंजूर केले असल्यास त्या बदल्यात सदर योजनेतील इतर काम मंजूर निधीच्या मर्यादेत राहून बदल करण्याचे अधिकार संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना राहतील. उपरोक्त कामाच्या बदल्यात सदर योजनेतील इतर काम करणे शक्य नसल्यास त्यासाठी वितरीत केलेला निधी शासनाच्या कोषागारात तात्काळ जमा करण्यात यावा. तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त कामांचे अंदाजपत्रक बांधकाम विभागाकडून प्राप्त करून घ्यावे. याबाबतची सर्व कागदपत्रे शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार प्राप्त करून घेण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी यांनी करावी. त्यानंतर त्यांना प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात यावी व निधी संबंधित महानगरपालिका/नगरपालिका/ नगरपंचायतीच्या बांधकाम विभागामार्फत रितसर करुन घेण्यात यावी.

३. राज्यातील महानगरपालिका/नगरपालिका/ नगरपंचायतींनी मागणी केल्यानुसार ज्या विवक्षित प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतींना निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायतींना सहा महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या **परिशिष्ट "ब"** मध्ये विहित केलेल्या नमुन्यात जिल्हाधिकाऱ्यांनी अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील महानगरपालिका / नगरपालिका / नगरपंचायतींनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

४. प्रस्तुत प्रकरणी संदर्भ क्र.४ च्या दिनांक ३१.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, सन २०१७-१८ करीता मुंबई उपनगर जिल्ह्याकरीता मंजूर निधी बीडीएस प्रणालीवर वितरीत करण्यात आला होता. मात्र, संबंधित कार्यालयाने तो विहित मुदतीत आहरित न केल्यामुळे सदर निधी व्यपगत झाला आहे. सबब, भविष्यात अशा प्रकारची द्विरुक्ती होणार नाही याची जिल्हाधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

५. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात क्षेत्रविकास योजनेकरिता सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षाकरिता मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील अनुक्रमे दि.२ एप्रिल,२०१८ रोजीच्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनांस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१८११२६१५०८०३७६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.11.26 15:18:47 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,

५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. संबंधित विभागीय आयुक्त,
१०.आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
११.संबंधित जिल्हाधिकारी,
१२.आयुक्त, संबंधित महानगरपालिका,
१३.मुख्याधिकारी, संबंधित नगरपालिका,
१४.मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
१५.सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१६.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१७.कक्ष अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८.निवडनस्ती ( का-९)

शासन निर्णय ,अल्पसंख्याक विकास विभाग क्र. नाक्षेवि-२०१८ /प्र.क्र. १३९ /का.९, दि. २६ नोव्हेंबर, २०१८

परिशिष्ट - "अ"

महाराष्ट्र राज्यातील अल्पसंख्याक बहुलनागरी क्षेत्रांकरिता क्षेत्र विकास कार्यक्रम महानगरपालिका /नगरपालिकांचे जिल्हानिहाय निधी वितरणाचे विवरणपत्र.

| अ. क्र | जिल्हा | म.न.पा./ न.पा. /नपा | कामांचे नांव | मंजूर निधी (रूपये) |
|---|---|---|---|---|
| १ | मुंबई उपनगर | मुंबई उपनगर | गोरेगाव मोतीलाल नगर-१, त्रिकोणी मैदान, मस्जिद जवळ सुशोभिकरण व लादीकरण करणे. | ३० लक्ष |
| | | | बांद्रा टीचर्स कॉलनी येथील मुस्लीम कब्रस्तान येथील प्रार्थनागृहाचे सुशोभीकरण व पुरुषांसाठी असलेल्या शौचालयाचे नुतनीकरण करणे. | १० लक्ष |
| | | | गोळीबार (सांताक्रुझ पूर्व) येथील मदरसा (शाळा) करीता संरक्षक भिंत बांधणे. | १० लक्ष |

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.11.26 15:19:17 +05'30'

( दि. मा. सोनवणे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**शासन निर्णय ,अल्पसंख्याक विकास विभाग क्र. नाक्षेवि-२०१८ /प्र.क्र.१३९ /का.९,**
**दिनांक २६ नोव्हेंबर, २०१८.**

## परिशिष्ट - "ब"

## उपयोगिता प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांसाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, **क्र. नाक्षेवि-२०१८ /प्र.क्र. १३९ /का.९, दिनांक नोव्हेंबर, २०१८** अन्वये वितरित केलेला रु.
(अक्षरी रु. ) एवढा निधि पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ. | रु. |
| ब. | रु. |
| क. | रु. |
| ड. | रु. |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधि मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

तपासणी केलेल्या दस्तऐवज/अभिलेखांचे प्रकार :-

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)
२. मोजणी पुस्तके (Measurement Books)
३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)
४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका यांची स्वाक्षरी | संबंधित महानगरपालिका / नगरपालिका ज्या जिल्हयात स्थित आहेत त्या जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |

*****